**सुधारीत प्रशासकीय मान्यता**
अलिबाग तालुक्यातील वरसोली खाडीवर
ग्रोयान्स पध्दतीचा बंधारा बांधणेच्या कामास
सुधारीत प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक : इआरएन ०३/००२/प्र.क्र. ८०/पीआरटी-१
मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२, दिनांक २४ नोव्हेंबर, २००४

वाचा : (१) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक : इआरएन - १३९६/सीआर १८/पीआरटी-१, दि. २८ फेब्रुवारी, २००१
(२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे जा. क्र. मुअ/(विप्र)/का-२/ वरसोली /१९३२, दिनांक २८ नोव्हेंबर, २००३
(३) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांचे पत्र क्रमांक :ममेबो/ अभि-३/ वरसोली/रायगड/२११७, दि. २० जुलै, २००४

**शासन निर्णय :-** वरसोली , तालुका अलिबाग, जिल्हा रायगड येथे ग्रोयान्स पध्दतीचा बंधारा ( ४२० मीटर ) बांधणेसाठी संदर्भाधिन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये रुपये ६,८१,६५,०४०/- ( रुपये सहा लाख, एक्क्याऐंशी लाख, पासष्ट हजार, शहासे चाळीस फक्त ) इतक्या खर्चाच्या कामास व त्यांचे नकाशे व अंदाजपत्रकास या शासन निर्णयाव्दारे प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापि, या कामाच्या परिमाणात वाढ झाली तसेच आकस्मिकता, संगणक, सेंटेज चार्जेस यामध्ये झालेली भाववाढ लक्षात घेता सदरहू अंदाजपत्रकामध्ये सुधारणा करावी लागलेली आहे. त्यामुळे आता या प्रकल्पाकरिता येणा-या रुपये ८,५४,४५,८३६/- ( रुपये आठ कोटी, चौपन्न लाख, पंचेचाळीस हजार , आठशे छत्तीस फक्त ) इतक्या सुधारित अंदाजपत्रकास या निर्णयाव्दारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या कामावरील खर्च "४७११- पूरनियंत्रण प्रकल्पावरील भांडवली खर्च, ०२ समुद्रधूपप्रतिबंधक प्रकल्प , ८०० इतर खर्च - समुद्रधूपप्रतिबंधक बांधकामे " या लेखाशिर्षाखाली खालील अटींच्या अधीन राहून करण्यात यावा.

" सदरील काम सुरु करण्यापासून ते काम संपेपर्यंत क्षेत्रीय अधिका-यांनी Coastal Engineering Unit, M.E.R.I., Nasik यांच्या तांत्रिक मार्गदर्शनाखालीच काम करावे."

३. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग, नियोजन विभाग यांच्या सहमतीने तसेच वित्त विभागाच्या मान्यतेने व त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक : ८४६/०४/ व्यय - ८, दिनांक २३.११.२००४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( पु. श्री.पाडगे )
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) महालेखापाल -१ लेखा( व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
२) महालेखापाल -१ ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र मुंबई
३) महालेखापाल -२ ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , नागपूर
४) महालेखापाल-२ ( लेखा परीक्षा) , महाराष्ट्र, नागपूर.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखाधिकारी, मुंबई
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई
८) मुख्य बंदर अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई.
९) किनारी अभियंता, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१०) पत्तन अभियंत्ता, पत्तन अभियांत्रिकी विभाग ( उत्तर), कोकण भवन, नवी मुंबई
११) जिल्हाधिकारी, रायगड.
१२) सार्वजनिक बांधकाम विभाग ( कार्यासन राम-२)
१३) नियोजन विभाग ( कार्यासन १४६३ व १४१४)
१४) वित्त विभाग ( व्यय-८)
१५) गृह विभाग ( बीयुडी-१)
१६) निवडनस्ती.